“महाराष्ट्र राज्य, जवाहर बालभवन, मुंबई येथील नियामक मंडळावर अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-बालभ-२०१९/प्र.क्र. १८१/एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १२ जुलै, २०२४.

**वाचा:-** शालेय व युवक सेवा विभाग, शासन निर्णय क्रमांक जेबीबी-११७६-४, दि.०६/०४/१९७७.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, मुंबई या संस्थेस शासन निर्णय दिनांक ०६ एप्रिल, १९७७ अन्वये नोंदणी कायदा, १८६० अंतर्गत नोंदणी करण्यास व त्याचे मेमोरेंडम ऑफ असोसिएशन व त्याचे नियम याकरिता मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन. मुंबई ही संस्था सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट अंतर्गत नोंदणीकृत संस्था आहे. सदर संस्थेच्या मेमोरेंडम ऑफ असोसिएशन मधील तरतूदीनुसार नियामक मंडळाची निर्मिती करण्यात आली असून, त्यामध्ये शासकीय व अशासकीय सदस्यांचा समावेश आहे. सदर नियामक मंडळ हे मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली निर्माण करण्यात आलेले आहे. या नियामक मंडळामध्ये शासनामार्फत ५ अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात येते. सद्यस्थितीत नियामक मंडळावर अशासकीय सदस्याची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या संस्थेच्या नियामक मंडळात खालील अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अशासकीय सदस्यांचे नाव | पत्ता |
|---|---|---|
| १ | श्री.प्रशांत तुकाराम भामरे | त्रिवेणी गार्डन, ए- ७०४, आधारवाडी, कल्याण (पश्चिम), जि. ठाणे. |

२. सदर अशासकीय सदस्यांचा कार्यकाळ या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षाचा किंवा शासनाचे पुढील आदेश यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत राहील.

३. सदर अशासकीय सदस्यांचे अधिकार व कर्तव्ये महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन मंडळाच्या नियमानुसार राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१२१६४७०४२६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181 18634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613 F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.07.12 16:58:21 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१३. शिक्षण संचालक (प्राथमिक), प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे.
१४. शिक्षण संचालक (माध्यमिक), प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे.
१५. संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बाल भवन, चर्नी रोड, मुंबई.
१६. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व).
१७. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), जिल्हा परिषद (सर्व).
१८. शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे कार्यालय, शिक्षण विभाग, त्रिवेणी संगम, पालव मार्ग, करी रोड (पुर्व), मुंबई.
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
२०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
२१. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२२. गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती (सर्व).
२३. संबंधीत अशासकीय सदस्य.
२४. निवडनस्ती (एसडी-१).